सचिव, विधी व न्याय विभाग, यांना
वित्तीय शक्ती प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्र. विअप्र १०८६/प्र.क्र.१०७०/कोषागारे-६,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २ फेब्रुवारी, १९८७.

वाचावे :-

१] शासन निर्णय, वित्त विभाग क्र.डीएफपी १०७५/११८७/[८३]/ जीईएन-५, दिनांक ७ फेब्रुवारी १९७६ च्या जोडपत्रातील अनुक्रमांक १७ समोरील बाबी.
२] कार्यालयीन आदेश विधी व न्याय विभाग क्र.इस्टटी १०८५/ १३०-दोन, दिनांक १८ जानेवारी, १९८५.
३] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.डीएलपी १०८६/ बारा, दिनांक २४ जुलै, १९८६.

निर्णय

वर क्र.३ स्थानी नमूद केलेल्या दि.२४ जुलै १९८६ च्या आदेशान्वये शासनाने नियुक्त केलेल्या "अधिकार प्रदान समितीने", विधी व न्याय विभागाकडून आलेल्या प्रस्तावाच्या आधारे सचिव, विधी व न्याय विभाग आणि विधी परामर्शी यांना वर क्रमांक १ स्थानी नमूद केलेल्या दिनांक - ७ फेब्रुवारी १९७६ च्या आदेशान्वये प्रदान करण्यात आलेल्या आणि सध्या अस्तित्वात असलेल्या वित्तीय शक्तींमध्ये वाढ करण्याबाबत केलेल्या शिफारशी शासनाने मान्य केल्या आहेत.

२. शासन असा आदेश देत आहे की, या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे सुधारित वित्तीय शक्ती आता "सचिव, विधी व न्याय विभाग आणि परामर्शी" यांना प्रदान करण्यात याव्यात.

३. या आदेशान्वये प्रदान केलेल्या वित्तीय शक्तीचा वापर हा अर्थसंकल्पीय तरतूद आणि वित्तीय प्रकाशनांतील नियम व विनियमन तसेच महाराष्ट्र विधी अधिकारी [नियुक्ती, सेवा शर्ती व शुल्क] नियम १९८४ व शासकीय विधीविषयक कामकाज चालविण्याचे नियम, १९८४ यामध्ये समाविष्ट केलेल्या व अंमलात असलेल्या सर्वसाधारण नियमांच्या अनुपालनाच्या अधीन राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
[दि. द. पारकी]
कक्ष अधिकारी, वित्त विभाग

शासन निर्णय, वित्त विभाग
क्र. विअप्र १०८६/प्र.क्र.१०७०/८६/कोषागार-६
दि. २.२.१९८७ चे सहपत्र -

- विवरणपत्र -

| अनु. क्रमांक | प्रदान करण्यात आलेल्या सुधारित अधिकाराचे स्वरूप/ वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम अधिकारी | प्रदत्त अधिकारांची मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. |
| १. | विधी अधिकारी अथवा पॅनेल सल्लागार [नियुक्ती सेवा शर्ती व शुल्क] नियम १९८४ व शासकीय विधी विषयक कामकाज चालविण्याचे नियम १९८४ मधील नियमात अंतर्भूत नसलेल्या वाढीव फी मंजूर करण्याच्या शक्ती प्रदान करणे. | सचिव, विधी व न्याय विभाग आणि विधी परामर्शी. | १) उच्च न्यायालयापर्यंतच्या विधी अधिकारी अथवा पॅनेल सल्लागारांना प्रतिदिन रु.१५००/- पर्यंत फी वाढ देण्यासाठी.<br>२) सर्वोच्च न्यायालया-समोरील प्रकरणांकरिता विधी अधिकारी अथवा पॅनेल सल्लागारांना फी वाढ देण्याचे संपूर्ण प्राधिकार | अर्थसंकल्पात तरतूद केलेली असली पाहिजे. आखून दिलेल्या कार्यपध्दतीचे व सर्व-साधारण निर्देशांचे/ अटींचे पालन केले पाहिजे. |
| २. | कनिष्ठ न्यायालयासमोरील आणि/किंवा सर्वोच्च न्यायालयासमोरील प्रकरणांत विधी अधिकारी अथवा पॅनेल सल्लागार यांना कोर्ट फी स्टॅम्पसाठी अग्रिम रक्कम तसेच प्रमाणित प्रती मिळविण्या-साठी अथवा पेपर बुक्स वगैरे टायपलो-स्टाईल करणे अथवा छापून घेणे इ. साठी येणारा खर्च मंजूर करणे. [कॉन्टिन्जंट अकाउंटसह] | सचिव, विधी व न्याय विभाग आणि विधी परामर्शी. | पूर्ण अधिकार | वरीलप्रमाणे |

| १. | २. | ३. | ४. | ५. |
|---|---|---|---|---|
| ३. | विधी अधिकारी अथवा पॅनेल समुपदेशी यांना महाविधी अधिकारी [ नियुक्ती सेवाशर्ती व शुल्क] नियम १९८४ व शासकीय विधी विषयक कामकाज चालविण्याचे नियम १९८४ यांत अंतर्भूत नसलेल्या फीचे दर मंजूर करणे. | सचिव, विधी व न्याय विभाग आणि विधी परामर्शी. | कनिष्ठ न्यायालय व उच्च न्यायालयातील विधी अधिकारी व पॅनेल समुपदेशींना सध्या विहित नियमांतील मर्यादेपलीकडील फी मंजूर करण्याचे प्राधिकार रु. १५००/- प्रतिदिन ह्या वित्तीय मर्यादेपर्यंत. | अर्थसंकल्पात तरतूद केलेली असली पाहिजे. आखून दिलेल्या कार्यपध्दतीचे व सर्वसाधारण निर्देशांचे/अटींचे पालन केले पाहिजे. |
| ४. | कोणत्याही न्यायालयाने न्यायमित्र [ Amicus Curie ] म्हणून नेमलेल्या अधिवक्त्याची न्यायालयाने प्रमाणित केलेली फी मंजूर करणे. | सचिव, विधी व न्याय विभाग आणि विधी परामर्शी | पूर्ण अधिकार | वरीलप्रमाणे |
| ५. | महाराष्ट्र राज्याबाहेरील न्यायालयासमोरील प्रकरणात संबंधित राज्याच्या विधी अधिकाऱ्यांच्या फी व इतर वादव्यय खर्च मंजूर करणे. | सचिव, विधी व न्याय विभाग आणि विधी परामर्शी | पूर्ण अधिकारी | १] वरीलप्रमाणे<br>२] संबंधित राज्याच्या विधी परामर्शी यांनी प्रमाणित केलेल्या दराप्रमाणे. |